**भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांचे सेवांतर्गत प्रशिक्षण**
**प्रशिक्षणासाठी जाताना करावयाची प्रशासकीय व्यवस्था.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**परिपत्रक क्र.टीआरएन-१००३/प्र.क्र.१५/२००३/दहा,**
**दिनांक :- २९.५.२००३.**

**-: परिपत्रक :-**

भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांसाठी " सेवांतर्गत प्रशिक्षणाची" योजना केंद्र शसनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागामार्फत राबविण्यात येते. या योजनेचा राज्य स्तरावरील समन्वय सामान्य प्रशासन विभाग / १२-अ मार्फत करण्यात येतो.

२. या संदर्भात असे निर्देशनास आले आहे की, अधिकाऱ्यांना जेव्हा या सेवांतर्गत प्रशिक्षणासाठी उपस्थित रहावयाच्या सूचना थेट कार्मिक व प्रशिक्षण विभागाकडून अथवा सामान्य प्रशासन विभाग/का.१२-अ, यांचेकडून देण्यात येतात तेव्हा संबंधित अधिकाऱ्यांकडून या प्रशिक्षणास उपस्थित रहाण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग / (मा.प्र.से.कक्ष) येथे संदर्भ करण्यात येतो. त्यावर या विभागाकडून पुन्हा प्रशिक्षण कालावधीत पर्यायी प्रशासकीय व्यवस्था करुन प्रशिक्षणासाठी कार्यमुक्त होण्याच्या सूचना निर्गमित केल्या जातात.

३. या सर्व कार्यवाहीत होणारी पुनरुक्ती टाळण्याच्या दृष्टीने आता असे आदेश देण्यात येत आहेत की, कार्मिक व प्रशिक्षण विभाग किंवा सामान्य प्रशासन विभाग/१२-अ यांचेकडून ३ महिने कालावधीपर्यंतच्या **(भाप्रसे अधिकाऱ्यांच्या फाउंडेशन कोर्स व इंडक्शन ट्रेनिंग वगळून)** सेवांतर्गत प्रशिक्षणासाठी जेव्हा अधिकाऱ्यांचे नामनिर्देशन केले जाते तेव्हा संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या वरीष्ठ अधिकाऱ्यांच्या सल्ल्याने त्यांच्या अनुपस्थिती कालावधीतील प्रशासकीय व्यवस्था करुन प्रशिक्षणासाठी कार्यमुक्त व्हावे. काही अपरीहार्य कारणामुळे प्रशिक्षणासाठी हजर राहणे शक्य नसल्यास, प्रशिक्षण कार्यक्रमात बदली करण्यास थेट कार्मिक व प्रशिक्षण विभागास व सामान्य प्रशासन विभाग/का.१२-अ यांना कळवावे. त्यासाठी सामान्य प्रशासन विभाग/(मा.प्र.से.कक्ष) येथे संदर्भ करण्याची आवश्यकता नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**(चारुशीला सोहोनी)**
**प्रधान सचिव (सेवा)**
**महाराष्ट्र शासन**

प्रत :-

१. सर्व मंत्रालयीन विभागांचे सचिव,
२. सर्व मंत्रालयीन विभागप्रमुख,
३. सर्व विभागीय आयुक्त,
४. सर्व जिल्हाधिकारी,
५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
६. सर्व मा.प्र.से. अधिकारी (नावाने),
७. सा.प्र.वि./का९, ९-अ व १२-अ,
८. निवड नस्ती.

C:\My Documents\ASD\Deo_Note